20110310155857001

पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण प्राधिकरणाच्या पेठ -१२ मधील माहिती तंत्रज्ञान व्यवसायासाठी आरक्षित असलेल्या जागेपैकी ४ हेक्टर जागा (१० एकर) केंद्रशासनाच्या सी.डॅक या संस्थेस देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. पीसीएन ३००७/२८९/प्र.क्र.११२/नवि २२

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

**दिनांक - ३० एप्रिल, २००७.**

**वाचा :-** १) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. वि.प्रा./विभाग ३/७८९९, दि. ५/१०/२००६ व प्राधिकरण सभा ठराव क्र. २६५ दि. २४/८/२००६

२) श्री. एस. रामकृष्णन, महानिदेशक, सी -डॅक यांचे पत्र क्र. डीजी/पीसीएमसी २००७ दि. १४/०२/२००७.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. वि.प्रा./विभाग ३. २१८६, दि. २१/०३/२००७.

प्रस्तावना-

सी -डॅक (सेंटर फॉर डेव्हलपमेंट ऑफ ॲडव्हान्स कॉम्प्युटिंग )ही केंद्र शासनाची माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रात कार्यरत असलेली उच्च दर्जा प्राप्त केलेली व संपूर्ण जगात नावलौकिक असलेली संस्था आहे. या संस्थेस पुणे परिसरात त्यांच्या कार्यालयास स्वतःची जागा नसून ही संस्था भाड्याच्या जागेत कार्यरत आहे. केंद्रशासनाच्या या संस्थेचे माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रातील आजपर्यंतचे कार्य पाहून ही संस्था राज्यात राहण्याची गरज लक्षात घेता, या संस्थेस कायमस्वरुपी जागा असणे आवश्यक आहे. त्यामुळे या संस्थेने प्राधिकरणाकडे ४ हेक्टर जागा मिळण्याबाबत मागणी केली होती. पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्र. १२ मधील माहिती तंत्रज्ञान व्यवसायासाठी राखीव असलेल्या एकूण [illegible].४४ हेक्टर जागेपैकी ४ हेक्टर जागा सी - डॅक या केंद्रशासनाच्या माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रात कार्यरत असलेल्या संस्थेस थेट पध्दतीने वाटप करण्यास प्राधिकरण सभा क्र.२६५ दि.२४.८.२००६ मध्ये मान्यता दिली आहे. प्राधिकरणाच्या भूवाटप नियम १९७३ च्या नियम ५ अन्वये शासनाच्या पूर्व मान्यतेने प्राधिकरणास थेट पध्दतीने जागाचे वाटप करण्याची तरतूद आहे. . प्राधिकरणाच्या सभेने दिलेली मान्यता विचारात घेवून,

केद्रशासनाच्या सी - डॅक या माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात कार्यरत असलेल्या संस्थेस प्राधिकरणाच्या पेठ क्र. १२ मधील माहिती तंत्रज्ञान व्यवसायासाठी राखीव असलेल्या ६.४४ हेक्टर जागापैकी ४ हेक्टर जागा थेट पध्दतीने वाटप करण्यास भू-वाटप नियमावली १९७३ च्या नियम- ५ अन्वये मान्यता देण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, यांनी प्रस्ताव सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्र.१२ मधील माहिती तंत्रज्ञान व्यवसायासाठी राखीव असलेल्या एकूण ६.४४ हे.जागेपैकी ४ हेक्टर जागा सी - डॅक या केंद्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रात कार्यरत असलेल्या संस्थेस प्राधिकरणाच्या भूवाटप नियम १९७३ च्या नियम- ५ अन्वये वाटप करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) या जागेचा वापर केंद्रशासनाच्या सी - डॅक या संस्थेसाठीच करण्यात येईल.

२) ही जागा भविष्यात देखील सी - डॅक या संस्थेस ज्या कारणास्तव देण्यात आलेली आहे, त्या व्यतिरिक्त अन्य कोणत्याही कारणासाठी वापरता येणार नाही.

३) ही जागा प्राधिकरणातील व्यावसायिक जागांच्या चालू बाजार भाव दराने देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

( डॉ. ज.मो. फाटक )
शासनाचे प्रधान सचिव

प्रति,

१. मा. मुख्यमंत्र्याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
२. मा. राज्यमंत्री, नगर विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई, ४०० ०३२..
३. अध्यक्ष, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे तथा आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
५. मा. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२ यांचे स्विय सहाय्यक.
६. निवडनस्ती, नवि २२